निलंबन रद्द करुन शासन सेवेत पुनस्थापित : करणेबाबत ..

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन आदेश क्रमांकः जेएलई-०३१५/प्र.क्र.६८/२०१५/तुरुंग-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
दुसरा मजला, मंत्रालय-४०० ०३२
दिनांक : ३० जानेवारी, २०१७

वाचा :

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : अभियो-१३१४/ प्र.क्र.८६ /११-अ, दिनांक १४ ऑक्टोबर,२०११
२) शासन आदेश, गृह विभाग, क्रमांक जेएलई-०३१५/प्र.क्र.६८/१५/तुरुंग-१, दि.३१.०३.२०१५
३) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्रमांक डीईएस/व्हीएसकांबळे/निलंबित/ अधीक्षक/ २०१५/ १०२२/ कक्ष-३, पुणे, दि.०४.१०.२०१६.

**शासन आदेश :-**

श्री.वैभव कांबळे, अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह हे नागपूर मध्यवर्ती कारागृह येथे कार्यरत असताना दि.३१.०३.२०१५ रोजी ५ कैद्यांनी खिडकीचा गज कापून व वाकुन पलायन केले होते. सदर प्रकरणी श्री.कांबळे यांना शासनाच्या संदर्भ क्र.२ अन्वये शासकीय सेवेतुन निलंबित करण्यात आले होते. या प्रकरणी विभागीय चौकशी आदेशित करण्यात आलेली आहे.

श्री.वैभव कांबळे यांच्या निलंबनास एक वर्षापेक्षा अधिक झालेला कालावधी विचारात घेऊन श्री.कांबळे यांचे निलंबन रद्द करुन त्यांना शासन सेवेत पुनर्स्थापित करण्यात येत आहे. तसेच पुर्नस्थापनेनंतर श्री.कांबळे यांची पदस्थापना खालील तक्त्यातील त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविल्याप्रमाणे पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-यांचे नांव | निलंबनापूर्वीचे पदस्थापनेचे ठिकाण | नविन पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | श्री.वैभव कांबळे, अधीक्षक, मध्यवर्ती कारागृह | नागपूर मध्यवर्ती कारागृह, नागपूर | मोर्शी खुले कारागृह (सध्याचे पद श्रेणी उन्नत करुन) |

२.   हे आदेश तात्काळ अंमलात येतील. श्री.कांबळे यांनी रुजु झाल्यानंतर रुजु अहवाल संबंधित अधिकाऱ्यांमार्फत शासनास सादर करावा.

३.   सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०१३०१५१०४९८३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.01.30 15:12:22 +05'30'

**( प्रभाकर संखे )**

कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
२) प्रधान सचिव (अ.व सु.) गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
३) अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक,महाराष्ट्र राज्य,पुणे
४) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर
५) महालेखापाल,महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,नागपूर
६) कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे/पश्चिम विभाग, पुणे/ मध्य विभाग, औरंगाबाद/ पूर्व विभाग,नागपूर
७) अधिदान व लेखा अधिकारी, नागपूर
८) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती
९) श्री.वैभव कांबळे, निलंबित अधीक्षक (द्वारा अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्यामार्फत)
१०) निवड नस्ती कार्यासन तुरुंग-१